**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी अनुदान उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः औप्रसं.-२०११/प्र.क्र. ९२/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

तारीख: १२ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक :आयटीआय-२०११/ प्र.क्र.११२/ व्यशि-३, दि. ०७ मे, २०१२**

२) **शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : प्रशामा-२०१३/प्र.क्र. १२०/ व्यशि-२, दि. १ सप्टेंबर, २०१४.**

प्रस्तावना -

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये "मुंब्रा-कौसा, जिल्हा ठाणे" या ठिकाणी अल्पसंख्यांकांसाठी नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यास, "सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी पदनिर्मिती, प्रस्तावित योजनेकरिता जागा उपलब्ध झाल्यानंतर इमारत बांधकाम, साधनसामुग्री व यंत्रसामुग्री इ. साठी लागणाऱ्या अपेक्षित खर्चाकरिता अल्पसंख्यांक विकास विभागाकडून अनुदान उपलब्ध होईल" या अटीच्या अधीन राहून तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दि. १ सप्टेंबर, २०१४ अन्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामसाठी रू.११,९१,०९,९४६/- (रूपये अकरा कोटी एक्याण्णव लाख नऊ हजार नऊशे सेहेचाळीस फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या बांधकामासाठी टप्प्याटप्याने अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जि. ठाणे या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी रू.२५,००,०००/- (रूपये पंचवीस लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास वरिष्ठ सचिव समितीने मान्यता देतांना नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितंरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

२. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी, शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/कार्यालयीन आदेश/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्य नियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

३. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्याना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

४. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, (०१) (०६) अल्पसख्याक वस्तीतील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना अनुदान देण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १२२) ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.२६/१४७५, दि.१७.१.२०१५ तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं. ७४/१५/व्यय-४, दि.२३.०१.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१०४५२७०७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.02.13 16:55:38 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालक (प्रशिक्षण) यांचे मार्फत)
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. नियोजन विभाग का. १४७५,
१०. वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११. अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी संबंधितांना BDS वर कृपया तात्काळ उपलब्ध करुन दयावा.
१२. निवडनस्ती.